**केंद्र पुरस्कृत योजना कापूस तंत्रज्ञान अभियान सन २०१०-११ मध्ये राबविण्यास वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-कापूस-१६१० / प्र.क्र.७४ /४-अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२.**
**दिनांक :- १४ सप्टेंबर २०१०**

**संदर्भ:-** १) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग क्र. कापूस -१६०९/सीआर-६४/४-अे, दिनांक १ ऑगस्ट,२००९

२) केंद्र शासन, कृषि मंत्रालय पत्र क्र. १८-१/२००९/सीअे-५, दिनांक १६ एप्रिल,२०१० व दि.२६ जुलै,२०१०.

३) शासन निर्णय समक्रमांक, दिनांक ११ जून,२०१०.

४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कापूस/ योजना/२०१०-११/२६६/विप्र-३/१०, दिनांक ९.८.२०१०.

**प्रस्तावना:-**

कापूस पिकाचे उत्पादन व उत्पादकता वाढविण्याच्या दृष्टीने केंद्र पुरस्कृत सधन कापूस विकास कार्यक्रम राज्यात सन १९८२-८३ पासून राबविण्यात येत आहे. या योजनेच्या निधीत केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण अनुक्रमे ७५: २५ असे आहे. केंद्रीय कृषि मंत्रालयाने त्यांच्या संदर्भाधीन दिनांक २७ एप्रिल,२०१० च्या पत्रान्वये सन २०१०-११ मध्ये सदर योंजना राबविण्याकरिता एकूण रु.१५७.३३ लाखाच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. त्यास अनुसरुन सदर योजना सन २०१०-११ मध्ये राबविण्याकरिता रु.१५७.३३ लाखाच्या कार्यक्रमास संदर्भाधीन दि.१० जून २०१० च्या शासन निर्णयान्वये शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात आली . (यामध्ये केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा अनुक्रमे रु.१२५.५० लाख व रु.३१.८३ लाख असा होता.)

केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि.२६ जुलै, २०१० च्या पत्रान्वये प्रथम हप्त्यापोटी केंद्र हिश्श्याचा रु.७५.०० लाख निधी मुक्त केला आहे. केंद्र शासनाने दिलेली वित्तीय मान्यता विचारात घेऊन सद्य:स्थितीत प्रथम हप्त्यापोटी केंद्र हिश्श्याच्या रु.७५.०० लाखाच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सधन कापूस विकास कार्यक्रम राज्यात सन २०१०-११ मध्ये राबविण्याकरिता केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि.२६ जुलै, २०१० च्या पत्रान्वये केंद्र हिश्श्याचा रु.७५.०० लाख निधी मुक्त केला आहे. केंद्र शासनाने दिलेली वित्तीय मान्यता विचारात घेऊन सद्य:स्थितीत प्रथम हप्त्यापोटी केंद्र हिश्श्याच्या रु.७५.०० लाखाच्या कार्यक्रमास याव्दारे शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

जिल्हाधिकारी यांच्या अख्यत्यारितील जिल्हानिहाय कार्यक्रमास वित्तिय तरतूद सबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडून स्वतंत्रपणे वितरीत करण्यात येईल. या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१०-११ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक डी-३** **(रु. लाखात )**

२४०१ पीक संवर्धन १०८, वाणिज्यिक पिके
केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा ७५ टक्के ) (०१)(०२)
**कापूस विकासासाठी तंत्रज्ञान अभियांन** (२४०१ २५४२) ३३ अर्थसहाय्य ( रु.७५.००)

२.	या योजनेची उद्दिष्टे मंजूर निधीच्या मर्यादेत ठेवावीत. केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दिनांक १६ एप्रिल,२०१० च्या पत्रातील केंद्र पुरस्कृत कापूस तंत्रज्ञान अभियान योजनेच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन केंद्र पुरस्कृत कापूस तंत्रज्ञान अभियान सन २०१०-११ मधील काही कार्यक्रम स्वंयसेवी अशासकीय संस्था, कृषि विज्ञान केंद्र, कृषि विद्यापीठे, यांचेमार्फत राबविण्यास शासन मान्यता देत आहे. या संस्थेमार्फत या योजनेतील राबवावयाचे कार्यक्रम आणि संस्थाची निश्चिती करण्याविषयी आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार अशासकीय संस्थाची निवड करण्याचे निकष ठरवावेत आणि त्यानुसार स्वयंसेवी अशासकीय संस्थेमार्फत या योजनेअंतर्गत राबवावयाचे कार्यक्रम योग्यरित्या राबविण्यात येतील, यासाठी संनियंत्रण करावे.

३.	या कार्यक्रमाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन उद्दिष्टनिहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्याची दक्षता घेण्यात यावी.

१) लाभार्थी निवडतांना लहान व सिमांतक शेतकरी यांना प्राधान्य देण्यात यावे.

२) मंजूर निधीपैकी कमीत कमी १६% निधी अनुसूचित जाती व ८_% निधी अनुसूचित जमातीसाठी खर्च करण्यात यावा तसेच याबाबतच्या नोंदी स्वतंत्रपणे ठेवण्यात याव्यात.

३) योजनेची अंमलबजावणी अधिक प्रभावी व परिण्ामकारकरित्या होण्याच्या दृष्टीने या योजनेंतर्गत प्रकल्पाधारित विकास /विस्तार कार्यक्रम (Projectised Development/ Extension Approch) राबविण्यात यावा.

४) या योजनेचे मुल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून (Third Party Evaluation ) करुन घ्यावे

५) वैयक्तिक लाभार्थी निवडतांना प्रथम महिला लाभार्थीना प्राधान्य देण्यात यावे. असे लाभार्थी उपलब्ध नसल्यास इतर लाभार्थीची निवड करण्यात यावी.

६) सन २००९-१० मध्ये लाभ घेतलेल्या व २०१०-११ मध्ये वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी तालुका कार्यालये/ पंचायत समिती/जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी तसेच ती यादी इंटरनेटवर देखील देण्यात यावी.

४.	केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा मासिक आर्थिक व भौत्तिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याला ५ तारखेपर्यंत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

५.	सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१८७/१०/व्यय-१, दि. ३ सप्टेंबर,२०१० अन्वये दिलेल्या सहमतीसह त्याचप्रमाणे अप्पर मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन दिला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०१००९१८१९३९५०००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( वि. मा. बिवलकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे.
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
विभागीय आयुक्त (सर्व),
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व).
जिल्हाधिकारी (सर्व) (बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व))(बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व))
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित,
आरे दुग्ध कॉलनी गोरेगांव(पूर्व),मुंबई ६५.
मुख्य लेखा व वित्त अधिकारी,जिल्हा परिषद(सर्व))(बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, महाबीज भवन, कृषि नगर,अकोला.
सहसंचालक,लेखा व कोषागारे, संगणक कक्ष,नवीन प्रशासकीय भवन,५वा मजला,
मंत्रालय, मुंबई (२ प्रतीत).
महालेखापाल (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२,मुंबई / नागपूर.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
नियोजन विभाग, (का.१४४४/१४३१) मंत्रालय, मुंबई ३२.
सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
वित्त विभाग, व्यय-१, अर्थसंकल्प-१३.
सर्व सह सचिव / उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी,
कृषि व पदुम विभाग (कृषि व फलोत्पादन).
निवड नस्ती.

## शासन निर्णय क्र. कापूस - १६१० / प्र.क्र ७४/४अे , दि. १४ सप्टेंबर, २०१० चे परिशिष्ट

( रूपये लाखात )

| अ.क्र. | बाब | परिमाण | अनुदानाचा दर | शासन निर्णयानुसार मुजूर कार्यक्रम | | | | केंद्र शासनाचे पत्र क्रमांक एफ नं -१८-१/ २००९ सीए. व्ही ( पीटी ) दि. २६ जुलै,२०१० | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | भौतिक | आर्थिक लक्ष्य | | | भौतिक | आर्थिक लक्ष्य | | |
| | | | | | केंद्र | राज्य | एकूण | | केंद्र | राज्य | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
| १ | शेतकरी शाळा | संख्या | रू. १७०००/- शेतकरी शेतशाळा ( ३० शेतकरी प्रशिक्षण पूर्ण हंगामाकरिता ) | ६०० | ७६.५० | २५.५० | १०२.०० | ६०० | ७६.५० | २५.५० | १०२.०० |
| २ | प्रवर्तकांना प्रशिक्षण | संख्या | रू. १०.०० लाख/ टीओएफ ( ६ महिन्यांच्या प्रशिक्षण कालावधीसाठी ) | ३ | ३०.०० | ०.०० | ३०.०० | ३ | ३०.०० | ०.०० | ३०.०० |
| ३ | जैविक औषधे पुरवठा | हेक्टर | औषधाच्या किंमतीच्या ५० टक्के किंवा जास्तीत जास्त रू. ९००/- हेक्टरच्या मर्यादेत | २६६७ | १८.०० | ६.०० | २४.०० | ५५२१ | ३७.२७ | १२.४२ | ४९.६९ |
| ४ | आकस्मिक खर्च | | | | १.०० | ०.३३ | १.३३ | | १.०० | ०.३३ | १.३३ |
| | **एकूण** | | | | **१२५.५०** | **३१.८३** | **१५७.३३** | | **१४४.७६** | **३८.२५** | **१८३.०२** |